**राज्यातील प्राविण्यप्राप्त खेळाडूंना शासकीय, निमशासकीय व इतर क्षेत्रात नोकरीसाठी ५ टक्के आरक्षण.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण १७१७ / प्र.क्र ३९/क्रीयुसे-२

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७ मार्च, २०१७.

<u>वाचा :-</u>

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र.राक्रीधो २००२ / प्र.क्र.६८ / क्रीयुसे-२, दि.०१ जुलै,२०१६.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र. संकीर्ण १७१७ / प्र.क्र ३९/क्रीयुसे-२, दि.१७ मार्च,२०१७.

<u>प्रस्तावना:-</u>

राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्पर्धेमध्ये पदक प्राप्त खेळाडू राष्ट्रास तसेच राज्यास लौकीक प्राप्त करुन देत असतात खेळाडूंना खेळामध्ये प्राप्त होणाऱ्या संधी व शैक्षणिक अर्हता मिळविण्याचा कालावधी एकच असल्याने दोन्ही आघाडींवर सारख्याच प्रमाणात लक्ष देणे शक्य नसते. ही बाब विचारात घेऊन खेळाडू आरक्षाणांतर्गत होणारी भरती प्रक्रिया अधिक पारदर्शक व्हावी या दृष्टीने शासनाने दि.०१ जुलै,२०१६ रोजी शासन निर्णयानुसार सर्वसामावेशक सूचना दिल्या आहेत. सदर शासन निर्णयानुसार खेळांच्या विविध स्पर्धांकरीता अधिकृत संस्थांची / संघटनांची मान्यता असण्याचा निकष निश्चीत केला आहे. यानुसार राज्य क्रीडा अजिंक्यपद स्पर्धेचे आयोजन महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशनशी संलग्न असलेल्या संबंधित खेळाच्या राज्य संघटनेने केलेले असावेत अशी तरतुद करण्यात आली आहे. तथापि, महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशनकडून संलग्नता प्राप्त करुन घेण्यास काही खेळांच्या संघटनांच्या विविध कारणांमुळे अडचणी निर्माण होतात व त्यामुळे संबंधित खेळाच्या खेळाडूंना आरक्षणाचा लाभ मिळू शकत नाही, अशी बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेता संबंधित खेळाडूंवर अन्याय होऊ नये यादृष्टीने दि.१७ मार्च,२०१७ रोजी निर्गमित केलेल्या संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता व त्याबाबत आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

या शासन निर्णयाद्वारे उपरोक्त संदर्भाधीन दिनांक १७ मार्च २०१७ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून आता खेळाडू आरक्षणाबाबतच्या सूचनांमध्ये पुढील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

खेळाडू आरक्षणाबाबतच्या उपरोक्त संदर्भाधीन दिनांक ०१ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयाच्या अनुक्रमांक ३ (अ) (iv) मधील " राज्य क्रीडा अजिंक्यपद स्पर्धांचे आयोजन महाराष्ट्र ऑलिम्पिक असोशिएशनशी संलग्न असलेल्या संबंधित खेळाच्या राज्य संघटनेने केलेले असावे."या तरतूदीनंतर खालील तरतूद समाविष्ट करण्यात यावी:-

"तसेच ज्या खेळांच्या नोंदणीकृत राज्य संघटना त्यांच्या अधिकृत राष्ट्रीय संघटनेशी संलग्न असतील, तसेच सदर खेळांच्या राष्ट्रीय संघटनेला इंडियन ऑलिम्पिक असोसिएशनने संलग्नता दिलेली

असल्यास, अशा राज्य संघटनेच्या स्पर्धेतील राज्यस्तरीय प्राविण्यप्राप्त खेळाडूंना आरक्षणाचा लाभ देण्यात येईल. त्यासाठी संबंधित राज्य संघटनेला महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशनची संलग्नता हा निकष अनिवार्य राहणार नाही."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२७१९२९४६००२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2017.03.27 19:31:40 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्र्याचे सचिव
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
५. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा,महाराष्ट्र राज्य,पुणे
६. संचालक, शिक्षण (प्राथमिक/माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
९. लोकायुक्त, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर,मुंबई
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
११. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
१३. सर्व मंत्रालयीन विभाग
१४. सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख
१५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१६. सर्व शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद
१७. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय,मुंबई
१९. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी
२०. निवड नस्ती, क्रीयुसे-२.